**शासन हमी देण्यासंदर्भातील प्रस्ताव वित्त विभागास सादर करतांना परिपूर्ण प्रस्ताव सादर करण्याबाबत तसेच, शासन हमी दिलेल्या प्रकरणांवर संनियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने त्रैमासिक आढावा घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : शाहमी-२०२०/प्र.क्र.२०/अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- १६ मार्च, २०२०

वाचा -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८

परिपत्रक:

राज्यातील सहकारी साखर कारखाने, महामंडळे, सहकारी संस्था यांना वित्तीय संस्थांकडून कर्ज उभारण्यास संदर्भाधिन शासन निर्णय, वित्त विभाग दि.५.११.१९९९ मधील मार्गदर्शक सुचनांनुसार शासन हमी देण्यात येते. सदर शासन निर्णयातील परि.४ मध्ये हमीबाबतचा प्रस्ताव वित्त विभागाकडे पाठवितांना खालील नमूद केलेल्या मुद्यांच्या संदर्भात आवश्यक ती माहिती संबधित विभागाच्या सचिवांच्या सहीच्या प्रमाणपत्रासह पाठविण्याबाबत नमुद करण्यात आले आहे.

१. पूर्वी घेतलेल्या कर्जावरील हमी शुल्क वेळोवेळी नियत दिनांकास भरले किंवा कसे.

२. प्रस्तावित हमीची कालमर्यादा व परतफेडीचे वेळापत्रक दर्शविणारे विवरणपत्र.

३. शासनाकडून तसेच वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जापैकी अदत्त कर्जाची रक्कम, थकबाकीच्या स्पष्टीकरणासह दर्शविणारे परतफेडीचे वेळापत्रक.

४. सध्या घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यामध्ये झालेल्या कसुरीचा तपशील, त्यामुळे देय झालेले व्याज ( कारणमिमांसेसहीत)

५. सध्या घेतलेले व प्रस्तावित केलेले कर्ज याची परतफेड कधी करणार हे दर्शविणारे, उपलब्ध निधीचा ओघ दर्शविणारे विवरणपत्र.

६. लाभधारक संस्थेचे मागील ३ वर्षाचे नफा-तोटा दर्शविणारे लेखे व ताळेबंदी पत्रक यांचे संदर्भ देऊन निर्धारित केलेली आर्थिक स्थिती दर्शविणारे विवरणपत्र.

२. तथापि, असे निदर्शनास येत आहे की, प्रशासकीय विभागांकडून हमी देण्यासंदर्भातील जे प्रस्ताव या विभागास प्राप्त होतात त्या प्रस्तावांसोबत वरील मुद्यांची सविस्तर माहिती विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येत नाही. त्यामुळे शासन हमी देण्यासंदर्भातील प्रस्तावावर वित्त विभागाचे विस्तृत अभिप्राय देता येत नाहीत. तसेच बहुतांश वेळा शासन हमी देण्याचे प्रस्ताव हे मंत्रिमंडळ

बैठकीच्या आदल्या दिवशी वित्त विभागास प्राप्त होत असतात. त्यामुळे सदर प्रस्तावाची छाननी करुन वित्त विभागाचे अभिप्राय देण्यास पुरेसा वेळ मिळत नाही. यास्तव शासन हमीचे देण्यासंदर्भातील मंत्रिमंडळ प्रस्ताव वित्त विभागास सादर करतांना सदर प्रस्तावांची छाननी करण्यास पुरेसा कालावधी मिळेल याची दक्षता घ्यावी. तसेच प्रस्तावासोबत वरील मुद्यांची सविस्तर माहिती या **परिपत्रकासोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये** उपलब्ध करुन देण्याबाबतच्या सूचना पुन्हा सर्व प्रशासकीय विभागांना देण्यात येत आहेत.

३. तसेच, संदर्भाधिन दि.५.११.१९९९ च्या शासन निर्णयातील परि.२(एच) नुसार ज्या प्रकरणात शासकीय हमी दिली असेल त्या प्रकरणावर संनियंत्रण ठेवण्याची सर्व जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची आहे. सबब कर्जाच्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार कर्ज व त्यावरील व्याजाची परतफेड तसेच, हमीशुल्काचा भरणा विहीत दिनांकास होत आहे किंवा कसे याची पडताळणी करण्याकरीता संबंधित प्रशासकीय विभागाने सचिव स्तरावर त्रैमासिक आढावा घेणे आवश्यक आहे. तसेच, ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/वित्त विभाग या कार्यासनानेही अदत्त शासन हमी, प्रलंबित शासन हमी, देय हमीशुल्क व प्रलंबित हमीशुल्क याबाबत सचिव स्तरावर त्रैमासिक आढावा घ्यावा.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००३१६१५०५५९९३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

Digitally signed by Jayant Balkrishna Kulkarni
DN: CN = Jayant Balkrishna Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2020.03.16 17:27:20 +05'30'

सोबत : विवरणपत्र

**( ज. बा. कुलकर्णी )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
२. सर्व व्यय - कार्यासने/ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. ऋण व हमी संनियंत्रण कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२.
४. निवड नस्ती/अर्थबळ

-------------

(शासन परिपत्रक क्रमांक : शाहमी-२०२०/प्र.क्र.२०/अर्थबळ, दि. १६ मार्च, २०२० सोबतचे विवरणपत्र)

**शासन हमीचे प्रस्ताव वित्त विभागास सादर करतांना प्रस्तावासोबत सादर करावयाची माहिती**

१) प्रशासकीय विभागाचे नाव :

२) महामंडळ/सहकारी संस्था इ. यांचे नाव :

३) ज्या उद्दीष्टासाठी हमी आवश्यक आहे ते उद्दीष्ट :

४) प्रस्तावित हमीची रक्कम : अ) मुद्दल -

ब) व्याज-

५) ज्या वित्तीय संस्थेकडून कर्ज घेण्याचे प्रस्तावित आहे त्या वित्तीय संस्थेचे (बँकेचे) नाव :

६) कर्ज परतफेडीचा कालावधी :

७) घेण्यात येणाऱ्या कर्जावरील व्याजदर :

८) पूर्वी शासनहमीवर घेण्यात आलेल्या कर्जापैकी अदत्त(outstanding) कर्जाची रक्कम थकबाकीच्या स्पष्टीकरणासह देण्यात यावी.

९) पूर्वी शासनहमीवर घेतलेल्या कर्जावरील हमीशुल्क नियत दिनांकास भरणा केले आहे किंवा कसे:

१०) कर्जावरील हमीशुल्क प्रलंबित असल्यास त्याची कारणे :

११) संस्थेचे मागील ३ वर्षाचे नफा तोटा दर्शविणारे लेखे व ताळेबंदी पत्रक यांचे संदर्भ देऊन निर्धारीत केलेले आर्थिक स्थिती दर्शविणारी स्वयंस्पष्ट टिप्पणी स्वंतत्र जोडण्यात यावी.

१२) प्रस्तावित कर्जाच्या व त्यावरील व्याजाच्या परतफेडीचा तपशिल (Repayment Schedule)-

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | महिना | उचलण्यात यावयाच्या कर्जाची रक्कम | कर्जाची परतफेड | अदा करावयाचे व्याज |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | एकूण | | | |

१३) प्रस्तावित कर्जाच्या परतफेडीचे स्त्रोत (Sources for Repayment)

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | उत्पन्नाचे स्त्रोत | अपेक्षित रक्कम (रुपये) | कालावधी |
|---|---|---|---|
| | (कर्जाची परतफेड कोणत्या उत्पन्नातून करण्यात येणार आहे त्याचा तपशिल येथे नमूद करावा) | | |
| | | | |
| | | | |
| | एकूण | | |

***********